**नारळ विकास मंडळ, कोची पुरस्कृत नारळाच्या उत्पादकतेत एकात्मिक शेती अंतर्गत वाढ घडवून आणणे हा कार्यक्रम सन २०११-१२ मध्ये राबविण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
कृषी, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक-नावियो २०११/प्र.क्र.१०२/१३ अे
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १६ जून, २०११

वाचा :- नारळ विकास मंडळ, केंद्र शासन, कृषि मंत्रालय, कोची यांचे पत्र क्र.२२३/२०११-डीईव्ही, दिनांक १८ एप्रिल, २०११

**शासन निर्णय :-**

नारळ विकास मंडळ, केंद्र शासन, कृषि मंत्रालय, कोची यांनी त्यांचे संदर्भाधीन दिनांक १८ एप्रिल, २०११ च्या पत्रान्वये परिशिष्ट-१ नुसार नारळ विकास मंडळ, कोची पुरस्कृत नारळाच्या उत्पादकतेत एकात्मिक शेती अंतर्गत वाढ घडवून आणणे हा कार्यक्रम सन २०११-१२ या वर्षी राबविण्यास रूपये ९७.२५० लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता दिली असून राज्य शासनास वरीलप्रमाणे मान्यता देण्याची विनंती करण्यात आली आहे. नारळ विकास मंडळ, कोची यांनी विनंती केल्यानुसार रूपये ९७.२५० लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त योजनेच्या अंमलबजावणीसाठी लागणारा निधी नारळ विकास मंडळ, कोची यांनी लेखाधिकारी विभागीय कृषि सहसंचालक यांचे कार्यालय, कोकण विभाग, ठाणे यांच्या नावे डिमांड ड्राफ्टने उपलब्ध करुन द्यावा.

३. या कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने मंजूर केलेली आर्थिक व भौतिक उद्दिष्टे, अनुदानाचा दर यांची सविस्तर माहिती सोबतच्या परिशिष्ट-१ मध्ये देण्यात आलेली आहे.

४. या योजनेची अंमलबजावणी करण्याकरीता उद्दिष्ट निहाय मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याकरीता तसेच ही योजना राबविण्यासाठी लागणारा निधी नारळ विकास मंडळ, कोची यांचेकडून उपलब्ध करुन घेण्याची कार्यवाही करण्याकरिता संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घेण्यात यावी.

1) योजनेची अंमलबजावणी करताना महिलांसाठी ३०%, अनुसूचित जातीकरीता १६% व अनुसूचित जमातीकरीता ८% अशी विशेष तरतूद करण्यात यावी.
2) या योजनेचे मूल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून (Third Party Evaluation) करुन घ्यावे.
3) गत दोन वर्षात वैयक्तीक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये /पंचायत समिती /जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी. तसेच ती यादी इंटरनेटवर देखील देण्यात यावी.

योजनेच्या अंमलबजावणीचा मासिक व तिमाही प्रगती अहवाल नारळ विकास मंडळास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपूर्वी सादर करण्यात यावा.

योजनेच्या यशस्वी व कालबध्द अंमलबजावणीकरीता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग | - | अध्यक्ष |
| २) संचालक फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य,पुणे | - | सदस्य |
| ३) भारतीय कृषि संशोधन परिषदेचा प्रतिनिधी | - | सदस्य |
| ४) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापिठाचा प्रतिनिधी | - | सदस्य |
| ५) श्री.वसंत विष्णू लिमये, सदस्य, नारळ विकास मंडळ | - | सदस्य |
| ६) उप संचालक, नारळ विकास मंडळ, विभागीय शाखा, ठाणे | - | संघटक |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक (२०११०६१६११२१४३००१) असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( अ. रा. राणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.**

**प्रति,**

**मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,**
**मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव**
**मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव**
**मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा मुंबई**
**मा. सभापती / उपसभापती महाराष्ट्र विधान परिषद, मुंबई**
**सर्व विधानसभा /विधान परिषद सदस्य**
**मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक**
**प्रधान सचिव, विधान मंडळ सचिवालय, मुंबई**
**अध्यक्ष, नारळ विकास बोर्ड (कृषि मंत्रालय, भारत सरकार) केरा भवन, एसआरव्हीएचएस रोड, कोची ६८२०११.**

**संचालक, नारियल विकास बोर्ड, रिजनल ऑफिस क्र.८९३, सुभश्री, वेस्ट ऑफ बोर्ड रोड, ii स्टेट,राजाजीनगर, बेंगलोर ५६००८६**
**आयुक्त, (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे-१७**
**संचालक,(फलोत्पादन) महाराष्ट्र राज्य,पुणे**
**कुलगुरु, डॉ. बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी**
**विभागीय कृषि सहसंचालक, कोंकण विभाग, ठाणे-४**
**उद्यान विद्या प्रमुख, बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी**
**महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरिक्षा) मुंबई / नागपूर,**
**संचालक लेखा व कोषागारे संचालनालय , मुंबई**
**जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, ठाणे, रायगड (अलिबाग), रत्नागिरी, सिंधुदुर्ग (ओरोस)**
**नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ /वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,**
**माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२**
**सर्व उपसचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई**
**कक्ष अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई**
**संगणक समन्वय कक्ष कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई**
**निवडनस्ती १३-अे.**

**शासन निर्णय क्र.नावियो २०११/प्र.क्र.१०२/१३-अे, दि. १६ जून, २०११ चे सहपत्र**

**<u>प्रपत्र-१</u>**

## नारळ विकास बोर्ड पुरस्कृत एकात्मिक शेतीद्वारे नारळबागांच्या उत्पादकतेत वाढ घडवून आणण्याचा कार्यक्रम-सन २०११-२०१२

महाराष्ट्र (रुपये लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नाव | उद्दिष्ट | | |
|---|---|---|---|---|
| | | भौतिक | आर्थिक | |
| | | | एकूण | मंडळाचा हिस्सा |
| अ | भारताच्या नारळ उद्योगाची एकात्मिक वाढ | | | |
| १ | रोपण साहित्याचे उत्पादन व वितरण | | | |
| | **प्रादेशिक नारळ<br>अ) रोपवाटीकेची स्थापना (५०:५० तत्वावर) | | | |
| | *ब) खाजगी रोपवाटीका व बिज केंद्रांना मदत<br>बिजकेंद्र (मोठे प्रकल्प)<br>रोपवाटीका (लहान प्रकल्प) | | | |
| २ | नारळाच्या उत्पादकतेत वाढ घडवून आणण्याकरीता एकात्मिक शेती | | | |
| | अ) लेईंग आऊट डेमॉन्स्ट्रेशन प्लॉट<br>**राज्यस्तरीय देखभाल २०१०-११<br>*प्रत्यक्ष | <br>५० हे.<br>२०० हे. | <br>८.७५०<br>८७.५०० | <br>८.७५०<br>८७.५०० |
| | *सेंद्रीय खत प्रकल्प | ५ प्रकल्प | १.००० | १.००० |
| ब | *टेक्नॉलॉजी मिशन ऑन कोकोनट | | प्रकल्पावर आधारीत | प्रकल्पावर आधारीत |
| | एकूण | | ९७.२५० | ९७.२५० |

* बोर्डामार्फत

** राज्य शासनामार्फत